**सहाय्यक प्राध्यापक, विद्युत अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा गट-अ पदावरील सरळ सेवेने नियुक्तीबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. उवतंशि/ तांशि-१/३३/१४/६५/१३**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक :- २१ जून, २०१७

**पहा -:** १) सामान्य प्रशासन विभाग यांचे शासन परिपत्रक क्र. एसआरव्ही-२०१५ /प्र.क्र. १५६ कार्य- १२, दि.८ मे, २०१५
२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्र.१५(१)(८१)/१६९३१/सात-अ,दिनांक १८ जानेवारी, २०१७ चे पत्र.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधिन क्र. २ येथिल पत्रान्वये सहाय्यक प्राध्यापक, विद्युत अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये , महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालये शिक्षक सेवा, गट-अ या पदाकरीता एकूण ०९ उमेदवारांची शिफारस केली आहे. त्याअनुषंगाने सदर ०९ उमेदवारांपैकी ०८ उमेदवारांची सहाय्यक प्राध्यापक, विद्युत अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये , महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालये शिक्षक सेवा, गट-अ या पदावर त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या रकान्यात ते ज्या दिनांकापासून त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकृत करतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिवीक्षा कालावधीसाठी महसुली विभाग वाटप नियम-२०१५ नुसार स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र | उमेदवाराचे नाव | गुणवत्ता क्रमांक | वर्गवारी | आयोगाची शिफारस | नियुक्तीचे ठिकाण | आभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. राव मयुरेश नरहरी | २ | खुला | खुला-२ | शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय,जळगाव | निरंक |
| २ | श्री. प्रफुल विजय नंदनकर | ३ | विमाप्र | खुला-३ | शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर | निरंक |
| ३ | श्री. वाल्मिक अशोक गव्हाणे | ४ | इमाव | इमाव-१ | शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय,जळगाव | वैद्यकिय अहवाल व औरंगाबाद येथिल चारीत्र्य पडताळणी अहवालाच्या अधिन राहून |
| ४ | श्री. प्रशांतकुमार विठ्ठलराव धवस | ५ | इमाव | अपंग | शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय,चंद्रपूर | निरंक |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ५ | श्री. महिंद्रकर शैलेश किशोर | ६ | इमाव | इमाव | शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड | निरंक |
| ६ | श्रीमती मोरखडे स्वप्ना अशोक | ७ | इमाव | इमाव (महिला) | शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड | निरंक |
| ७ | श्रीमती शराना तरन्नुम मो. जहीर | ८ | खुला | खुला-(महिला) | शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय,चंद्रपूर | निरंक |
| ८ | श्रीमती मोरे कल्पना किसन | ९ | खुला | खुला-(महिला) | शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड | निरंक |

३. अनु. क्र. ३ येथिल श्री. गव्हाणे वगळता इतर उमेदवारांना संबंधित वैद्यकीय मंडळाने वैद्यकीय दृष्ट्या शासकीय सेवेसाठी पात्र ठरविले आहे. तसेच श्री. गव्हाणे वगळता इतर उमेदवारांचा चारित्र्य पडताळणी अहवाल देखिल प्राप्त झालेला आहे. तशी नोंद त्यांच्या सेवापुस्तकामध्ये घेण्यात यावी.

४. उपरोक्त उमेदवारांची सहाय्यक प्राध्यापक, विद्युत अभियांत्रिकी ,शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयीन या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदर उमेदवाराची वेतनश्रेणी रु. १५६००- ३९१००/- या पे बँड व उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एसपीसी-२०१०/(३४/१०)/तांशि-२ दि. २०/०८/२०१० मध्ये नमुद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारास प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवाराचे परिविक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) सदर उमेदवाराची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१ /२००१/३९, दि.७/८/२००० अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी /वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार शासन

निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/ २००१/३९, दि. १९/३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

७) सदर उमेदवाराचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे.

८) सदर उमेदवाराने त्यांच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत तात्काळ रुजु व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही. शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही तर, कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

९) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००९/प्र.क्र.३२/सेवा-४, दि. १८/०८/२००९ मधील तरतुदीनुसार दि. १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असलेल्या शासकीय कर्मचा-यांने त्याच किंवा अन्य विभागातील निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि. १ नोव्हेंबर,२००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि.१२ जानेवारी, २००७ मधील (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधीत शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन), नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि. १८/०८/२००९ च्या परिपत्रकात नमूद (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यास नवीन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू ठरती.

१०) शिफारसपात्र मागासवर्गीय उमेदवाराचे जाती विषयक दावे संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून / संबंधित प्राधिका-याकडून तपासून घेण्यात यावेत.

११) तसेच अपंग प्रवर्गाच्या उमेदवारांचे अपंगत्वाचे प्रमाणपत्र आयुक्त, अपंग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून तपासून घेण्यात यावे.

१२) सदर उमेदवारांचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

१३) उमेदवारास नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१४) सदर उमेदवाराने नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसुचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०५. सदर नियुक्ती उमेदवाराने सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबुन राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवाराची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०६. हे आदेश प्राप्त होताच संबधित उमेदवाराने नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधित संस्थाप्रमुखाकडे सादर करावा .

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६२११६३५४८९७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2017.06.21 16:32:57 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
**कार्यासन आधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति -:**

सर्व उमेदवार (नोंदणीकृत डाकेने)

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).
२. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय , पुणे/नाशिक/नागपूर
६. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड/जळगाव/चंद्रपूर
(वरील उमेदवारांना रुजू करुन घेताना त्यांच्या शैक्षणीक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन ते पात्र असल्याची संस्थाप्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारांना हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा. तसेच संबंधित संस्थाप्रमुखांनी या आदेशातील ज्या उमेदवारांची नियुक्ती अटीच्या अधिन राहुन केली आहे त्या उमेदवारांकडून विहीत मुदतीत या अटीची पुर्तता करुन घेवून त्याबाबतचा कार्यपूर्तता अहवाल संचालक, तंत्रशिक्षण यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२ मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा/ जळगाव/चंद्रपूर
९. निवड नस्ती (तांशि-१).